राज्यातील व्यावसायिक शिक्षण व कौशल्यवृद्धी आणि त्यासाठीच्या आवश्यक पायाभूत सुविधांच्या बळकटीकरणासाठी Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) प्रकल्पास तत्वत: मान्यता देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जाबॅप्र-२०२३ / प्र.क्र.०६/ व्यशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०८ जून, २०२३.

वाचा:- १) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखालील दि. ०३ डिसेंबर २०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) DEA च्या छाननी समितीचे बैठकीचे इतिवृत्त, दिनांक २७ फेब्रुवारी २०२३.
३) केंद्र शासन, वित्त विभागाचे आर्थिक कार्य विभाग (DEA), पत्र, दिनांक ९ मार्च २०२३.

**प्रस्तावना:-**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागामार्फत सन २०१५ पासून "कुशल महाराष्ट्र, रोजगारयुक्त महाराष्ट्र" या ध्येयपूर्ती साठी विविध कौशल्य प्रशिक्षण व नाविन्यपूर्ण योजना कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्यात येते. यासाठी या विभागामार्फत राज्यामध्ये औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या माध्यमातून औद्योगिक क्षेत्रास आवश्यक असणारे व्यावसायिक प्रशिक्षण, याच सोबत अल्प व दिर्घ मुदतीचे कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रम, रोजगार व स्वयंरोजगारासंबंधीचे मार्गदर्शन, रोजगार मेळावे, स्टार्टअप यात्रा, स्टार्टअप विक, ग्रॅंड चॅलेंज या सारख्या कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येते. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करीता तज्ञ मनुष्यबळ, अत्याधुनिक पायाभूत सुविधा यांचे बळकटीकरण करण्याची आवश्यकता आहे. सदर वस्तुस्थिती लक्षात घेता राज्यातील व्यावसायिक शिक्षण व कौशल्यवृद्धीविषयक योजनांची अंमलबजावणी आणि त्यासाठीच्या आवश्यक पायाभूत सुविधांच्या बळकटीकरणाकरिता आर्थिक सहाय्य उपलब्ध होण्यासाठी दिनांक ०३ डिसेंबर २०२१ रोजी तत्कालीन मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली जागतिक बँक आणि संबंधित वरिष्ठ शासकीय अधिकारी यांचेत झालेल्या सविस्तर चर्चेच्या अनुषंगाने जागतिक बँक आणि महाराष्ट्र शासन यांनी संयुक्तरीत्या Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) प्रकल्प राबविण्याचे निश्चित केले.

सदर प्रकल्पाचा प्राथमिक प्रकल्प अहवाल (Preliminary Project Report) वित्त विभागामार्फत आर्थिक कार्य विभाग (DEA), भारत शासन यांना दि.१० जानेवारी, २०२३ रोजी मान्यतेसाठी सादर केलेला होता. यास अनुसरुन केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाच्या (DEA) छाननी समितीच्या दिनांक २७ फेब्रुवारी २०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे.

त्यानुषंगाने, Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) तत्वतः मान्यता देण्याची तसेच या प्रकल्पाच्या आखणी व अंमलबजावणी, समन्वय, नियंत्रण व देखरेखीकरिता "प्रकल्प निरिक्षण समिती", "प्रकल्प अंमलबजावणी संस्था" स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या वित्त विभाग, आर्थिक कार्य विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन राज्यामध्ये जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) संपूर्ण राज्यामध्ये राबविण्यासाठी "तत्वतः मान्यता" देण्यात येत आहे.

२. Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) आखणी व अंमलबजावणीसाठी प्रकल्पाचा विस्तृत प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) तयार करणे, प्रकल्प समन्वय, नियंत्रण व देखरेखीसाठी खालीलप्रमाणे “प्रकल्प समन्वय समिती”गठित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**“प्रकल्प समन्वय समिती”**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे पदनाम व कार्यालय | पद |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी | अध्यक्ष |
| २ | कुलगुरु, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ | सदस्य |
| ३ | आयुक्त, कौ.वि.रो.व उ. आयुक्तालय, नवी मुंबई. | सदस्य |
| ४ | सह सचिव/उप सचिव (अर्थ), कौ.रो.उ.व ना.विभाग मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी | सदस्य |
| ६ | संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई. | सदस्य |
| ७ | संचालक, म. रा.कौ.वि.व्य,.शि. व प्रशिक्षण मंडळ, मुलुंड, मुंबई. | सदस्य |
| ८ | सहायक संचालक (वित्त व लेखा), कौ.वि.रो.व उ. आयुक्तालय, नवी मुंबई. | सदस्य |
| ९ | विशेष कार्यकारी अधिकारी | सदस्य सचिव |

प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता आवश्यकतेनुसार तज्ञ व्यक्ती यांना निमंत्रीत करण्यात येईल.

३. Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी विभागांतर्गच्या खालील कार्यालयांना “प्रकल्प अंमलबजावणी कक्ष” (Project Implementation Unit) म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

१. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय
२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय
३. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी
४. महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी
५. महाराष्ट्र राज्य कौशल्य, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ
६. महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ

उपरोक्त प्रकल्प अंमलबजावणी संस्था या प्रकल्पातील त्यांचेशी संबंधित असलेल्या घटकांच्या संदर्भात आवश्यक माहिती व संसाधने (Inputs & resources) “प्रकल्प समन्वय समिती” यांना सादर करतील आणि समितीच्या निर्णयानुसार प्रकल्पाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करतील.

४. सद्यस्थितीत, तात्पुरत्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटीच्या नोंदणीकृत कार्यालयात Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH) प्रकल्पाचे कामकाज सुरु करण्यात यावे.

५. या प्रकल्पाकरिता स्वतंत्र अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध होईपर्यंत प्रकल्पाच्या आखणीकरिता येणारा खर्च महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीकडील महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था यांना सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्ष २२३०६१२७ अंतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा. उपलब्ध

तरतुदीतून भागविण्यात यावा तसेच, आवश्यकतेनुसार सदर प्रकल्पाच्या मनुष्यबळ व अन्य संसाधनांचा वापर करण्यात यावा.

६. सदर प्रकल्पाचा आराखडा तयार करण्यासाठी आवश्यकतेनुसार विविध शासकीय संस्थांसोबत सामंजस्य करार करण्यास तसेच प्रकल्पाकरिता "प्रकल्प सल्लागार संस्था" (Project Management Unit) आणि "स्वतंत्र तपासणी संस्था" (Independent Verification Agency) यांची नेमणूक करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर प्रकल्पाचा प्राथमिक प्रकल्प आराखडा सुमारे रुपये २३०७ कोटी रक्कमेचा आहे. (१ USD = रु. ७५.३८३० या विनिमय दराने USD २१४.२२६ Million) सदर प्रकल्पाच्या कार्यान्वयनासाठी आवश्यक असलेल्या एकूण निधीपैकी ७०% निधी जागतिक बँकेच्या कर्जाद्वारे व उर्वरित ३०% निधी राज्य शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार आहे.

८. Development of Applied Knowledge and Skill for Human Development (DAKSH)प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी प्रकल्प समन्वय समितीकडून सादर होणाऱ्या विस्तृत प्रकल्प अहवालास शासन मान्यता घेणे, विस्तृत प्रकल्प अहवालानुसार आवश्यक असणारे मनुष्यबळ शासन प्रतिनियुक्तीने आणि कंत्राटी तत्वावर पदनिर्मिती करून उपलब्ध करणे, व त्यानुषंगाने इतर आवश्यक बाबींची पूर्तता करणे यासाठी स्वतंत्र रित्या मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी.

९. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १९६/१४७१ दि.१८-०५-२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५९/व्यय-०६ दिनांक ३१-०५-२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०९१२१५३८६४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C6A286229ECC7982A08553F49D547EF64BE25C7F26FC96324ECE7CCCBFEB8C5, cn=NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2023.06.12 15:29:32 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. कुलगुरू, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, (नियोजन) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय नवी मुंबई.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
६. सह सचिव/ सर्व उप सचिव,कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
८. संचालक, म. रा.कौ.वि.,व्य.शि. व प्रशिक्षण मंडळ, मुलुंड, मुंबई.